**प्रजासत्ताक दिन - सन २०२० करीता मुंबई येथे होणाऱ्या चित्ररथ संचलनासाठी संकल्पना चित्र व चित्ररथ आयोजन खर्चास मंजुरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. प्रजादि ४२१९ (११)/प्र. क्र. २९१/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ८ जानेवारी, २०२०**

वाचा :- १) सामान्य प्रशासन विभाग (राजशिष्टाचार), मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र. सीईआर २०१९/प्र.क्र.२१०/३०, दिनांक ६ डिसेंबर, २०१९
२) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचे पत्र क्र. सांकासं/ ४१३७ व ४१३८, दिनांक ३१ डिसेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

राज्य शासनामार्फत भारतीय प्रजासत्ताक दिनाचा ७० वा वर्धापन दिन समारोह दिनांक २६ जानेवारी, २०२० रोजी शिवाजी पार्क, दादर, मुंबई येथे संपन्न होणार आहे. सदर समारोहात होणाऱ्या चित्ररथ संचलनात सांस्कृतिक कार्य विभागाचा चित्ररथ सहभागी होणार आहे. सदर चित्ररथाचे संकल्पना चित्र व चित्ररथ संचलनाच्या आयोजन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनामार्फत २६ जानेवारी, २०२० रोजी मुंबई येथे संपन्न होणाऱ्या भारतीय प्रजासत्ताक दिनाच्या ७० व्या वर्धापन दिन समारोहात होणाऱ्या चित्ररथ संचलनात सांस्कृतिक कार्य विभागामार्फत "सरखेल कान्होजी आंग्रे यांचे ३५० वर्षाचे आरमार" या संकल्पनेवर आधारीत चित्ररथ सहभागी होणार आहे. सदर चित्ररथ संचलन संकल्पना चित्रास व या चित्ररथ संचलनाच्या आयोजनाकरिता येणाऱ्या रुपये ४७,१५,०००/- (रुपये सत्तेचाळीस लाख पंधरा हजार फक्त) इतक्या खर्चास खालील तपशीलाप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खर्चाची बाब | एकूण रुपये |
|---|---|---|
| १. | चित्ररथ बांधणी खर्च (ट्रेलर खर्चासह) | ४०,००,०००/- |
| २. | चित्ररथ त्रिमिती प्रतिकृती तयार करणे (मॉडेल) टेक्नीकल डाटा, दुरुस्ती खर्चासह | ७०,०००/- |
| ३. | चित्ररथावरील ३० कलाकारांचे मानधन - तालमीसह (प्रवास खर्चासह) (३० कलाकार x ५ दिवस x १०००) | १,५०,०००/- |
| ४. | नृत्य दिग्दर्शक मानधन (प्रवास खर्चासह) | १५,०००/- |
| ५. | कलाकार चहापान - अल्पोपहार खर्च | ७०,०००/- |
| ६. | कलाकारांसाठी वेशभूषा व रंगभूषा, इतर साहित्य खरेदी | ३५,०००/- |
| ७. | जाहिरात खर्च | ६०,०००/- |
| ८. | चित्ररथाचे व्हिडीओ चित्रीकरण | १०,०००/- |
| ९. | चित्ररथावरील ध्वनि व्यवस्था तसेच तालमी करिता ध्वनिव्यवस्था | ३०,०००/- |
| १०. | चित्ररथासंबंधातील रंगीत माहितीपत्रक, डिझाईन, छपाई | ४०,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ११. | स्थानिक प्रवास खर्च | ५०,०००/- |
| १२. | चित्ररथावरील संगीत ध्वनिमुद्रण खर्च | १,००,०००/- |
| १३. | समन्वयक मानधन | १५,०००/- |
| १४. | कलाकार ओळखपत्र, छपाई, लॅमिनेशन व छायाचित्र खर्च | ५,०००/- |
| १५. | इतर आकस्मिक खर्च | ७५,०००/- |
| | **एकूण खर्च** | **४७,१५,०००/-** |

(अक्षरी रुपये सत्तेचाळीस लाख पंधरा हजार फक्त)

२. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, (००) १०२, कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०४) (०१) इतर महोत्सव, (२२०५ १६०५) ५० इतर खर्च (योजनेतर योजना) या लेखाशीर्षाखालील सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविता यावा.

४. सदर प्रस्तावास वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार, संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांना प्राप्त खर्च करण्याच्या अधिकारानुसार मान्यता देण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दि. ८ जुलै, २०१९ मधील परिच्छेद क्र. ४, १४, १५ ची पुर्तता होत असून उर्वरित सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ८ जुलै, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या निधीमधून विभागास खर्च करण्याच्या अधिकारानुसार सदर खर्च मंजूर करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२००१०८११४०४७१४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6cc4d20348a52de465c7c34a61591bbe69b747ae11457103a0cfb9a57fc6ce6, serialNumber=cb03c92b399cc89310bf1378c184d97a4b7b9b98e926ea8e71dd7bc9cb273631, cn=Vilas Ramrao Thorat
Date: 2020.01.08 15:33:57 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. राज्यमंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ मुंबई, महाराष्ट्र राज्य
९. महालेखापाल (लेखा परीक्षा ) - १ मुंबई, महाराष्ट्र राज्य
१०.अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
११.निवड नस्ती, सां.का.४